मुंबईतील कापड गिरण्यांची जमीन विक्री
व विकास यासंदर्भात स्थापित संनियंत्रण
समितीच्या अध्यक्षांच्या मानधनाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एनटीसी २०१३/प्र.क्र.३१/टेक्स-३**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : १५ सप्टेंबर, २०१५.

**संदर्भ** :- १) शासन निर्णय क्रमांक मुमंस २०००/९२३/प्र.क्र.२३१/टेक्स-३, दि. २४.१२.२००१
२) शासन निर्णय क्रमांक एनटीसी २००७/प्र.क्र.४०/टेक्स-३, दि. २०.६.२००७
३) शासन निर्णय क्रमांक एनटीसी २००७/प्र.क्र.४०/टेक्स-३, दि. ४.७.२००७
४) शासन निर्णय क्रमांक एनटीसी २०११/प्र.क्र.१४२/टेक्स-३, दि. २९.९.२०११
५) अध्यक्ष, संनियंत्रण समिती यांचा प्रस्ताव दिनांक १०.७.२०१२.

**प्रस्तावना :-**

मुंबईतील कापड गिरण्यांच्या जमीन विकास व विक्रीतून उपलब्ध होणाऱ्या निधीच्या विनियोगावर नियंत्रण ठेवण्यासाठी विकास नियंत्रण नियमावलीच्या नियम ५८(९) मधील तरतूदीनुसार, मुंबई उच्च न्यायालयाचे सेवानिवृत्त न्यायाधीश, श्री. बी. व्ही. चव्हाण यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भांकित क्र. १ येथील शासन निर्णयानुसार संनियंत्रण समिती गठीत करण्यात येवून समितीची कर्तव्ये व जबाबदाऱ्या, तसेच मानधन व सोईसुविधा स्पष्ट करण्यात आल्या आहेत.

२. सदर समितीस वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आलेली असून, उपरोक्त क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मानधन निश्चित करण्यात येवून, क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये त्यात वाढ करण्यात आलेली आहे.

३. संदर्भांकित क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये संनियंत्रण समितीच्या अध्यक्षपदी श्री. ए. एस. अग्यार, सेवानिवृत्त न्यायाधीश, मुंबई उच्च न्यायालय यांची नियुक्ती करण्यात आली आहे. अध्यक्ष, संनियंत्रण समिती यांनी केलेल्या विनंतीनुसार समितीच्या अध्यक्षांच्या मानधनात वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याअनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय**

संनियंत्रण समितीच्या अध्यक्षांना दरमहा रु. ३०,०००/- एवढे मानधन निश्चित करण्यात येत आहे. तसेच समितीच्या प्रत्येक बैठकीप्रित्यर्थ रु. ३,०००- एवढी रक्कम त्यांना अनुज्ञेय राहील.

२. संनियंत्रण समितीच्या अध्यक्षांना इतर सोई-सुविधा व तद्नुषंगिक बाबी शासन निर्णय दिनांक २४.१२.२००१ मध्ये स्पष्ट केल्यानुसार पुढेही कायम राहतील.

३. सदर आदेश नगर विकास विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१८१२१२१६१४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anand Arjun Mali

Digitally signed by Anand Arjun Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anand Arjun Mali
Date: 2015.09.18 12:16:18 +05'30'

(आ.अ.माळी)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. श्री. ए. एस. अग्यार, सेवानिवृत्त न्यायाधीश, बेनालीन होम, १२२ कलिना, सांताक्रुज (पूर्व), मुंबई ४०००२९.
२. अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (नगर विकास), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
४. प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
५. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
६. प्रधान सचिव (गृह निर्माण), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
७. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
८. कामगार आयुक्त, कॉमर्स सेंटर, ताडदेव, मुंबई (या शासन निर्णयाच्या प्रती, गिरणी व्यवस्थापन व कामगार संघटना यांना अग्रेषित करण्याच्या विनंतीसह)
९. प्रमुख अभियंता (विकास नियोजन) बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
१०.मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
११.मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
१२.मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
१३.मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
१४.मा. मंत्री (गृह निर्माण) यांचे खाजगी सचिव
१५.मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
१६.अध्यक्ष, राष्ट्रीय मिल मजदूर संघ, मजदूर मंझील, गं.द.आंबेकर मार्ग, परेल, मुंबई

१७.अध्यक्ष, गिरणी कामगार संघर्ष समिती, मॉडर्न मिल कंपाऊंड, सातरस्ता, मुंबई ४०००११

१८. अध्यक्ष, गिरणी मालक संघ, एलफिस्टन बिल्डिंग, २ रा मजला, १० वीर नरिमन रोड, फोर्ट, मुंबई.

१९.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वस्त्रोद्योग महामंडळ मर्या., लोटस हाऊस, ३३ए, न्यु मरिन लाईन, मुंबई ४०००२०

२०.अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय वस्त्रोद्योग महामंडळ मर्या, (उत्तर) मुंबई अपोलो हाऊस, ३८२, एन.एम.जोशी मार्ग, चिंचपोकळी, मुंबई ४०००११

२१.अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय वस्त्रोद्योग महामंडळ मर्या, (दक्षिण) मुंबई अपोलो हाऊस, ३८२, एन.एम.जोशी मार्ग, चिंचपोकळी, मुंबई ४०००११

२२.उप सचिव (वस्त्रोद्योग) टेक्स-३, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,

२३.कार्यासन अधिकारी, टेक्स-४, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई

२४. निवड नस्ती टेक्स-३.